नव्याने स्थापित कौशल्य विकास व
उद्योजकता विभागाच्या आस्थापनेवर
१४ पदे निर्माण करण्याबाबत ........

महाराष्ट्र शासन
कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
शासन निर्णय क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.०७/प्रशा-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ११ /०६ /२०१५.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र.एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५/दहा, दि.१५/०१/२०१५

२) कौशल्य विकास व उद्योजकता विभागाचा शासन निर्णय क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.२१/प्रशा-१, दि.६/४/२०१५.

३) वित्त विभाग वित्तीय सुधारणा कार्यासनाचे दिनांक २०/०५/२०१५ रोजीच्या पत्र क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.२१/१५/विसु-१ अन्वये पाठविण्यात आलेले उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२०/४/२०१५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

रोजगाराबाबत बदलत्या आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय परिस्थितीत कौशल्य विकास व उद्योजगतेस अधिक प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने तसेच या कार्यक्रमाकडे अधिक प्रभावीपणे लक्ष पुरविले जावे या उद्देशाने केंद्र शासनाने स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता या मंत्रालयाची निर्मिती केली आहे. केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यामध्ये देखील स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता विभागाची सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निर्मिती करण्यात आली आहे. केंद्र शासनाच्या कौशल्य विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२२ पर्यंत संपूर्ण भारतातील जवळपास ५० कोटी व्यक्तींना रोजगार प्राप्त होण्यासाठी रोजगाराभिमुख कौशल्य विकास प्रशिक्षण देण्याचे उद्दीष्ट निश्चित केले आहे. तसेच राज्यस्तरावर सदरचे उद्दीष्ट सन २०२२ पर्यंत ४.५० कोटी एवढे प्रशिक्षित मनुष्यबळ तयार करावयाचे आहे.

वरीलप्रमाणे कौशल्य विकास व उद्योजकता विभाग अशी नवीन विभागाची निर्मिती झाल्यामुळे यासंदर्भातील योजना प्रभावीपणे राबविण्याकरिता पहिल्या टप्प्यात उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी ही संस्था उक्त संदर्भ क्र.२ दि.६/४/२०१५ च्या शासननिर्णयान्वये या विभागाच्या अधिपत्याखाली आली आहे. कौशल्य विकास व उद्योजकता विभागाकडील कामाचा वाढता व्याप विचारात घेऊन सर्व कामांसाठी प्रथम टप्प्यात विभागास आवश्यक असलेल्या , सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेली विविध संवर्गातील १४ पदे निर्माण करण्याचा

प्रस्ताव सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यास दोन्ही विभागांनी दिलेली अनुमती विचारात घेऊन प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२०/०४/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. सदर बैठकीत समितीने विभागाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील १४ पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

नव्याने स्थापित कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या आस्थापनेवर सद्य:स्थितीत मंजूर असलेल्या २८ पदांखेरीज विविध संवर्गातील सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" येथील नमूद १४ पदे निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे. समितीने दिलेल्या मान्यतेनुसार विवरणपत्र "अ" येथे नमूद केलेली १४ पदे या विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१५०६१११५५८४८०१०३ असा आहे. हा आदेश आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Samridhi V Angolkar

Digitally signed by Samridhi V Angolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samridhi V Angolkar
Date: 2015.06.11 16:01:30 +05'30'

**( समृद्धी वि.अनगोळकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव.
३) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई -१.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई-१.

७) अधिदान व लेखा अधिकारी (रोखशाखेमार्फत)

८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे (पू), मुंबई-५१.

९) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक

१०) आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, कोकण भवन, नवी मुंबई.

११) उप सचिव/अवर सचिव, वित्तीय सुधारणा, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१२) उप सचिव /अवर सचिव (का-१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१४) निवडनस्ती (प्रशा-१)

**(कौशल्य विकास व उद्योजकता विभागाचे शासन निर्णय क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.७/प्रशा-१, दि. ११/०६/२०१५ सोबतचे विवरणपत्र "अ")**

**विवरणपत्र "अ"**

नवनिर्मित कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या आस्थापनेवर उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्माण करावयाचा १४ पदांचा तपशील :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ स्वीय सहायक | १५६००-३९१००, ग्रे.वे.६६०० | १ |
| २ | कक्ष अधिकारी | ९३००-३४८००, ग्रे.वे.४८०० | १ |
| ३ | निवडश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) | ९३००-३४८००, ग्रे.वे.४६०० | १ |
| ४ | सहायक | ९३००-३४८००, ग्रे.वे.४३०० | ३ |
| ५ | लघुटंकलेखक | ५२००-२०२००, ग्रे.वे.२४०० | १ # |
| ६ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२००, ग्रे.वे.१९०० | ५ # |
| ७ | वाहनचालक | ५२००-२०२००, ग्रे.वे.१९०० | १ (बाह्ययंत्रणेद्वारे) |
| ८ | शिपाई | ४४४०-७४४०, ग्रे.वे.१३०० | १ (बाह्ययंत्रणेद्वारे) |
| | **एकूण** | | **१४** |

# या पदांना मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेतील टंकलेखन/श्रुतलेखनाचे व संगणकाचे ज्ञान असणे आवश्यक राहील.